**कार्यक्रम अंदाजपत्रके २०१०-२०११**
**तयार करणे व मुद्रण करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
परिपत्रक क्रमांक: काअंप- १०.०९/ प्र.क्र. ६४/ अर्थसंकल्प-१
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३१ ऑक्टोबर, २००९

पूर्वसंदर्भ :-

१)शा.प.क्र.अंदाज-१००८/प्र.क्र.८०/अर्थसंकल्प-१, दि.२० सप्टेंबर,२००८
२)शा.प.क्र.अंदाज-१००८/प्र.क्र.८४/अर्थसंकल्प-१, दि.१५ ऑक्टोबर, २००८.

परिपत्रक :

विधानमंडळाच्या मार्च,२०१० मध्ये होणा-या अर्थसंकल्पीय अधिवेशनात सन २०१०-२०११ ची कार्यक्रम अंदाजपत्रके, अर्थसंकल्प विधानमंडळास सादर झाल्यानंतर त्याच दिवशी अथवा दुस-या दिवशी विधानमंडळ सदस्यांना उपलब्ध करुन द्यावयाची आहेत. सन १९८९-९० पासून कार्यक्रम अंदाजपत्रके फक्त मराठीमध्येच छापण्यात येतात. त्यातील विवरणपत्रे/तक्ते मात्र इंग्रजी व मराठी असे द्विभाषिक स्वरुपात छापण्यात येतात. सदर विवरणपत्रे /तक्ते यांच्या ५० जादा प्रती छापण्यात येऊन मंत्रालयीन विभागांनी चक्रमुद्रित केलेल्या इंग्रजी लिखाणाबरोबर त्याची बांधणी करण्यात येते. गतवर्षीच्या पध्दतीप्रमाणेच सन २०१०-२०११ च्या कार्यक्रम अंदाजपत्रकांची छपाई करावयाची आहे. कार्यक्रम अंदाजपत्रके तयार करतांना आतापर्यंत प्रसृत करण्यात आलेल्या सर्व सूचना विचारात घेण्यात याव्यात. विशेषत: "महाराष्ट्र शासनाच्या अर्थसंकल्पातील अर्थसहाय्य" हे प्रकाशन बंद करण्यात आलेले असल्यामुळे या प्रकाशनात देण्यात येणारी माहिती , गतवर्षीप्रमाणेच सन २०१०-२०११ च्या कार्यक्रम अंदाजपत्रकात समाविष्ट करतांना, उपरोक्त संदर्भांकीत क्र.२ मधील परिपत्रकांतील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

२. मंत्रालयीन विभागांना कार्यक्रम अंदाजपत्रकांचे मुद्रण करण्याबाबत नेमून दिलेल्या शासकीय मुद्रणालयामध्ये सन २०१०-२०११ ची कार्यक्रम अंदाजपत्रके छापून घ्यावयाची आहेत. कार्यक्रम अंदाजपत्रकाच्या छपाई व्यवस्थेबाबत, शासकीय मुद्रण व लेखनसामग्री संचालनालय, मुंबई यांच्या दि.१३ नोव्हेंबर १९९५ च्या पत्र क्रमांक जा.क्र.कार्यासन-६/मुं-४ (का.आ.) १९४१ द्वारे सर्व मंत्रालयीन विभागांना कळविण्यात आलेले होते. त्यामध्ये कोणताही फेरबदल केलेला नाही. या छपाई व्यवस्थेबाबत विभागांना कांही अडचण असल्यास, संचालक, शासकीय मुद्रण व लेखनसामग्री, मुंबई यांजबरोबर चर्चा करुन त्याप्रमाणे सन २०१०-२०११ ची कार्यक्रम अंदाजपत्रके छापून घ्यावीत.

*(कृ.मा.प.)*

३. सन २०१०-२०११ ची कार्यक्रम अंदाजपत्रके तयार करुन ती विधानमंडळाला सादर करण्याबाबतचे वेळापत्रक सोबत जोडले आहे. तरी, सर्व मंत्रालयीन विभागांनी या वेळापत्रकानुसार त्यात दाखविलेली कामे वेळच्यावेळी पूर्ण करुन नेमून दिलेल्या शासकीय मुद्रणालयाकडे वेळीच हस्तलिखिते पाठवून आपल्या विभागाच्या कार्यक्रम अंदाजपत्रकाच्या प्रकाशनाच्या बाबतीत आतापासूनच तयारीला लागावे. असे करतांना वर निर्देशित केलेल्या परिपत्रकातील सूचना लक्षात घेऊन आपली हस्तलिखिते तयार करावीत व पुढील वेळापत्रकाचे कटाक्षाने पालन करावे. मुख्यत: अंदाज समितीने कार्यक्रम अंदाजपत्रकाबाबत वेळोवेळी केलेल्या शिफारशी विचारात घेऊन आपापली प्रकाशने अंतिम मुद्रणासाठी पाठविण्यापूर्वी त्यांची फेरतपासणी करावी.

४. सन २०१०-२०११ ची कार्यक्रम अंदाजपत्रके, अंदाज समितीच्या शिफारशीनुसार विधानमंडळ सदस्यांना अर्थसंकल्प विधानमंडळास सादर झाल्यानंतर त्याच दिवशी अथवा दुस-या दिवशी उपलब्ध करुन द्यावयाची आहेत. कार्यक्रम अंदाजपत्रके विहित वेळेत विधानमंडळ सदस्यांना देता यावी , या दृष्टीने सोबत जोडलेल्या वेळापत्रकात नमूद केलेल्या तारखांचे काटेकोरपणे पालन करणे अत्यावश्यक आहे.

५. कार्यक्रम अंदाजपत्रकांच्या छपाईबाबत विभागाच्या संबंधित अधिका-यांशी संपर्क साधता यावा म्हणून सदर अधिका-यांची नावे, त्यांचे कार्यालयीन पत्ते, दूरध्वनी क्रमांक याबाबतची माहिती विभागांनी नेमून दिलेल्या मुद्रणालयास पाठवावी व त्याची एक प्रत संचालक, शासकीय मुद्रण व लेखनसामग्री, मुंबई आणि वित्त विभाग यांना माहितीसाठी पाठवावी. त्याचप्रमाणे कार्यक्रम अंदाजपत्रकाची हस्तलिखिते/मुद्रणप्रती मुद्रणालयाकडे पाठवितांना त्याबाबतची माहिती संचालक, शासकीय मुद्रण व लेखनसामग्री, मुंबई आणि वित्त विभाग यांना द्यावी.

६. सदर परिपत्रक शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २००९१०३११८२०४१००१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(सु.प्र.कानडे)
शासनाचे सह सचिव

सहपत्र : वेळापत्रक
प्रत :
१) सर्व मंत्रालयीन विभाग (संसदीय कार्य विभाग व विधानमंडळ सचिवालय सोडून)
२) कक्ष अधिकारी, सर्व अर्थसंकल्प कार्यासने, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
३) संचालक, शासकीय मुद्रण व लेखनसामग्री, मुंबई (२० प्रतीसह),
त्यांना अशी विनंती करण्यात येत आहे की, त्यांनी सर्व शासकीय मुद्रणालयांना योग्य त्या सूचना द्याव्यात व त्याची प्रत सह सचिव, वित्त विभाग यांना माहितीसाठी पाठवावी.
४) वित्त विभाग, कार्यासन प्रशासन-४ (१० प्रती), मंत्रालय, मुंबई
५)निवड नस्ती, अर्थसंकल्प-१

शासकीय परिपत्रक, वित्त विभाग,क्रमांक:काअंप-१००९/प्र.क्र.    /अर्थसंकल्प-१, दिनांक :    चे सहपत्र

<u>वेळापत्रक</u>

| क्र. | कामाचे स्वरुप | कामे पूर्ण करण्याचा दिनांक |
|---|---|---|
| १ | अ) चालू वर्षाच्या कार्यक्रम अंदाजपत्रकातील मजकुरामध्ये योग्य तो बदल करुन हस्तलिखिते तयार करणे.<br>ब) <u>वित्तीय आवश्यकता</u> च्या तक्त्यामधील शिर्षामध्ये<br>२००८-२००९ प्रत्यक्ष खर्च<br>२००८-२००९ अर्थसंकल्प<br>२०१०-२०११ सुधारित अंदाज<br>२०१०-२०११ अर्थसंकल्प<br>याप्रमाणे बदल करणे<br>क) <u>वित्तीय आवश्यकता</u> या तक्त्यामधील २०१०-२०११ अर्थसंकल्प या शीर्षाखालील आकडे भरणे व उरलेले रकाने (कॉलम) मोकळे ठेवणे.<br>ड) कमी करावयाची माहिती, तक्ते याबाबत पक्का निर्णय घेऊन मगच ते कमी करणे.<br>इ) <u>कार्यभाराचा गोषवारा</u> तक्त्यामधील शीर्षामध्ये वर (ब) मध्ये उल्लेखिलेले बदल करणे.<br>ई) <u>कर्मचारी वर्ग विषयक गोषवारा</u> हा तक्ता बदललेल्या व सुधारित स्वरुपात तयार करणे [वरील (ड) (इ) व (ई) (तक्ते व गोषवारा) सुधारणेबाबत वित्त विभाग, अर्थसंकल्प-१२ (आताचे वित्तीय सुधारणा-१) हयांनी दिलेल्या सूचनांप्रमाणे कार्यवाही करणे.]<br>वर उल्लेखिलेल्या (अ) ते (ई) मध्ये उद्धृत केलेली सर्व कामे पूर्ण करणे. | १६/११/२००९ |
| २ | सन २००८-२००९ च्या खर्चाचे प्रत्यक्ष रकमांचे आकडे संकलीत करणे.<br><u>वित्तीय आवश्यकता</u> तसेच <u>कार्यभाराचा गोषवारा</u> तक्त्यातही प्रत्यक्ष खर्चाचे आकडे भरणे. | |
| ३ | वरील अनुक्रमांक १ व २ येथे नमूद केलेली सर्व कामे पूर्ण करुन कार्यक्रम अंदाजपत्रके नेमून दिलेल्या शासकीय मुद्रणालयाकडे प्रथम मुद्रितांसाठी पाठविणे. | |
| ४ | सर्व शासकीय मुद्रणालयांनी प्रथम मुद्रितासाठी पाठविलेली कार्यक्रम अंदाजपत्रके मुद्रित करुन त्यांच्या प्रती संबंधीत विभागाकडे पाठविणे | १५/१२/२००९ |
| ५ | अ) प्रथम मुद्रित प्रतीतील भरलेले सन २००८-२००९ च्या प्रत्यक्ष खर्चाचे आकडे व सन २०१०-२०११ च्या अर्थसंकल्पीय तरतुदींची वित्त विभाग सादर करीत असलेल्या सन २०१०-२०११ च्या अर्थसंकल्पीय अंदाजाशी फेरतपासणी करणे व जरुर त्या ठिकाणी सुधारणा करणे.<br>ब) सन २०१०-२०११ या वर्षाच्या सुधारित अंदाजाच्या (योजनेतर व योजनांतर्गत) आकडयांचे संकलन/एकत्रिकरण करुन त्यांचा <u>वित्तीय आवश्यकता</u> तक्त्यात अंतर्भाव करणे व या आधारावर <u>कार्यभाराचा गोषवारा</u> या तक्त्यातही माहिती भरणे.<br>क) वरील (अ) व (ब) मध्ये नमूद केलेली कामे पूर्ण करतांना विभाग प्रमुखांनी /मंत्रालयीन विभागांनी वित्त विभागाशी आपल्या जबाबदार अधिका-यांद्वारा संपर्क साधून वित्त विभागाने मान्य केलेल्या अंतिम आकडयाशी आपले आकडे पडताळून पाहणे व योग्य तो फेरबदल करणे.<br>ड) सन २०१०-२०११ साठी प्रस्तावित अर्थसंकल्पाच्या आकडयांचे संकलन/ एकत्रिकरण करुन <u>वित्तीय आवश्यकता</u> तक्त्यात अंतर्भाव करणे.<br>त्यामध्ये <u>योजनेतर व योजनांतर्गत</u> अंदाजित खर्चाचे आकडे भरणे व त्या अनुषंगाने <u>कार्यभाराचा गोषवारा</u> यामध्ये सन २०१०-२०११ ची माहिती भरणे.<br>वर उल्लेखिलेल्या (अ) ते (ड) मध्ये उद्धृत केलेली सर्व कामे पूर्ण केल्यानंतर प्रथम मुद्रितांच्या प्रती विभागांना नेमून दिलेल्या शासकीय मुद्रणालयाकडे द्वितीय मुद्रितांसाठी पाठविणे. | ०८/१/२०१० |
| ६ | सर्व शासकीय मुद्रणालयांनी द्वितीय मुद्रितांसाठी पाठविलेली कार्यक्रम अंदाजपत्रके मुद्रित करुन त्यांच्या प्रती संबंधित विभागीय अधिका-यांकडे पाठविणे. | ३१०/१/२०१० |
| ७ | अ) सन २०१०-२०११ चे वित्त विभागाने अंतिमत: मान्य केलेले सुधारित अंदाजाचे <u>आकडे</u> व त्याअनुषंगाने <u>कार्यभाराचा गोषवारा</u> यामध्ये भरलेली तक्त्यातील माहिती तपासणे व योग्य तो फेरबदल करणे.<br>ब) सन २०१०-२०११ च्या <u>अर्थसंकल्पीय अंदाजाचे</u> वित्त विभागाने अंतिमत: मान्य केलेले आकडे व त्या अनुषंगाने <u>कार्यभाराचा गोषवारा</u> यामध्ये भरलेली तक्त्यातील माहिती तपासणे व योग्य तो फेरबदल करणे.<br>द्वितीय मुद्रित प्रतींवर वरील कामे पूर्ण केल्यानंतर वरील (अ) ते (ब) बाबत वित्त विभागाने अंतिमरित्या मान्य केलेल्या अर्थसंकल्पीय अंदाजाच्या आकडयांशी पुन: पडताळणी करणे. (म्हणजेच विधानसभेत सादर करण्यात येणार आहे, त्या अर्थसंकल्पाबरहुकूम कार्यक्रम अंदाजपत्रकात आकडयांचा अंतर्भाव केला आहे याची खातरजमा करुन घेणे) आणि बदलांच्या बाबतीत योग्य त्या दुरुस्त्या करणे. या प्रकारची सर्व तपासणी पूर्ण करुन अंतिमरित्या मुद्रणासाठी पाठविणे, त्यासोबत अंतिम मुद्रिते तपासण्याकरिता विभागाने आपले प्रतिनिधी संबंधित मुद्रणालयाकडे पाठविणे. | फेब्रुवारी २०१० चा शेवटचा आठवडा |
| ८ | सर्व कार्यक्रम अंदाजपत्रके विधानमंडळ सदस्यांना पारंपरिक <u>अर्थसंकल्प विधानमंडळाला सादर झाल्यानंतर त्याच दिवशी अथवा दुस-या दिवशी उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे.</u> | पारंपरिक अर्थसंकल्प विधानमंडळाला सादर करावयाच्या तारखेवर अवलंबून राहील, पण सर्वसाधारणत: मार्च महिन्याच्या दुस-या आठवडयात कार्यक्रम अंदाजपत्रकांचे वितरण करावे लागण्याची शक्यता आहे. |

--------